**मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा.लि. यांनी मराठी भाषा भवन, मुख्य केंद्र, मुंबई या इमारतीच्या बांधकामाच्या अनुषंगाने दाखल केलेला दावा निकाली काढण्याकरिता समिती गठित करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः भासस-२०२४/प्र.क्र. ६९/भाषा-१,**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :**-१. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.मुअ(मुं) / निविदा /३७०१/२०२४, दि. १९.०८.२०२४

२. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. MIDC/ TH/ TC/IFMS - C92497/of 2022, दि.०१.०९.२०२२

**प्रस्तावना** - गिरगाव महसूली विभागातील चर्नी मार्ग, मुंबई येथील भूखंडावर मराठी भाषा भवन, महाराष्ट्र, मुंबई (मुख्य केंद्र) या इमारतीचे बांधकाम करणे नियोजित आहे. शासन निर्णय़, मराठी भाषा विभाग, दि.०६.०४.२०२२ अन्वये सदर प्रकल्पाच्या बांधकाम खर्चाकरिता रु. १२६.८९ कोटी इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

२. सदर इमारतीच्या बांधकामाकरिता महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून (बांधकाम अभिकरण) ई-निविदा प्रक्रिया राबवून न्यूनतम देकार असलेल्या मे.कल्पना स्ट्रक्ट कॉन या कंपनीस दि.०१.०९.२०२२ रोजी कार्यारंभ आदेश देण्यात आले आहेत.

३. तद्‌नंतर मा. मंत्रिमंडळाच्या दि.२९.११.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये मराठी भाषा विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडील भूखंडाबाबत अंशत: अदलाबदल करुन भूखंडाच्या पुढील बाजूस मराठी भाषा भवन व मागील बाजूस सावित्रीबाई फुले वसतिगृह अशा दोन स्वतंत्र इमारतींचे बांधकाम करण्यास, मराठी भाषा भवन या इमारतीच्या आराखडे, बांधकामाकरिता सार्वजनिक बांधकाम विभाग या अभिकरणाची नियुक्ती करण्यास व त्यांच्यामार्फत नवीन निविदा प्रक्रिया करण्याकरीता, मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन या कंपनीसोबत केलेला करारनामा रद्द करण्यास व अन्य बाबींना मान्यता दिली. सदर मान्यतेस अनुसरुन शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, दि.१५.१२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात आला आहे.

४. शासन निर्णय, दि.०१.०३.२०२४ अन्वये प्रकल्पाच्या सुधारीत आराखड्यांना अनुसरुन रु.१५०.१४ कोटी इतक्या बांधकाम खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

५. मा.मंत्रिमंडळाने दि.२९.११.२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांनी मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा.लि. या कंत्राटदारास करारनामा रद्द झाल्याबाबत सूचना दिली असता कंत्राटदाराने दि.०८.०१.२०२४ रोजीच्या पत्रान्वये रु.१६.९९ कोटी इतक्या रकमेचा दावा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यकडे दाखल केला आहे.

६. मराठी भाषा भवनाच्या बांधकामासंदर्भात मा. मंत्री, मराठी भाषा यांच्या अध्यक्षतेखाली दि.०८.०२.२०२४ रोजी झालेल्या बैठक झाली सदर बैठकीमध्ये मा. मंत्री महोदयांनी सुधारीत आराखड्यानुसारच्या निविदा प्रक्रियेमध्ये मे.कल्पना स्ट्रक्ट या कंपनीकरिता Right of First refusal ची अट समाविष्ट करण्यात यावी असे निदेश दिले होते. नवीन निविदा प्रक्रियेमध्ये Right of First refusal ची अट समाविष्ट केल्यास दावा मागे घेण्यात येईल अशी सहमती संचालक, मे.कल्पना स्ट्रक्ट कॉन यांनी दर्शविली होती. तसेच मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा.लि. यांच्याकडून सादर करण्यात आलेल्या दाव्यातील प्रत्यक्ष खर्चाच्या बाबींसंदर्भात कागदपत्रांची महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून तांत्रिक तपासणी होऊन कागदपत्रे प्राप्त झाल्यानंतर खर्चाची पूर्तता करण्यात येईल, असे निदेश मा. मंत्री, मराठी भाषा यांनी दिले. मा. मंत्री महोदयांच्या मान्यतेस अनुसरुन शासनपत्र दि. ०७.०२.२०२४ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत निविदा प्रक्रिया राबवितांना मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा.लि. यांना Right of First refusal देण्याबाबत अट अंतर्भूत करण्यात यावी असे कळविण्यात आले आहे.

**७.** तथापि, नवीन प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी निविदा प्रक्रिया राबविली असता मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा. लि. या कंपनीने दोनवेळा निविदा किंमतीपेक्षा अत्याधिक दराने निविदा सादर केल्या आहेत.

८. मा. मंत्री, मराठी भाषा विभाग यांचे दालनात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिकाऱ्यासमवेत दि. १३/०८/२०२४ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा. लि. यांनी या पुर्वी केलेल्या कामाचा रु.१६.९९ कोटी रक्कमेचा दावा निश्चित करणे/ निकाली काढणेसाठी एक समिती गठित करण्याबाबत निर्णय झाला. त्यास अनुसरुन मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या दि. १९.०८.२०२४ रोजीच्या पत्रान्वये याप्रकरणी एक समिती गठित करण्याकरिता सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

मराठी भाषा भवन, मुख्य केंद्र, मुंबई या प्रकल्पाच्या बांधकामासंदर्भात मे. कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा. लि. यांनी यापुर्वी केलेल्या कामासंदर्भात रु.१६.९९ कोटी रक्कमेचा दावा निश्चित करणे/ निकाली काढणेसाठी सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे,

| | | |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई |
| २ | सदस्य सचिव | सहसचिव, मराठी भाषा विभाग, मुंबई. |
| ३ | सदस्य | उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८३०११११९४६५४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MARUTI LAXMAN LHAYAKAR

Digitally signed by MARUTI LAXMAN LHAYAKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=8b602cc35713bc737e58d3d44ef592bf297a5d88ada3a0b76b51280ec6081313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=48E018A56D88390B5D52CAF1AC6184FB1588E15FEBCF18C68DECE92BF6675298, cn=MARUTI LAXMAN LHAYAKAR
Date: 2024.08.30 11:35:13 +05'30'

**( मा.ल.ल्हायकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२ मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३ मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४ मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५ मा.मंत्री, मराठी भाषा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६ सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७ मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, विधान भवन, मुंबई,
८ मा.अध्यक्ष/सदस्य, मराठी भाषा समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
९ मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
१० महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
११ महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर,
१२ प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१३ प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
१४ प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१५ अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई,
१६ अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१७ सहसचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८ मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, मुंबई
१९ मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई

२० अधीक्षक अभियंता, मुंबई (सा. बां.) मंडळ, मुंबई.

२१ कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सा.बां.) विभाग, मुंबई.

२२ कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडह, विभाग क्रमांक १ ठाणे

२३ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२४ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२५ सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२६ संचालक, मं.कल्पना स्ट्रक्ट कॉन प्रा.लि., वाशी, नवी मुंबई.

२७. निवड नस्ती (भाषा -१)